**भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम २८-अ खालील वाढीव मोबदला रक्कम अदा करणेबाबत.**
**सीमा तपासणी नाका, वरुड, जि.अमरावती.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमव्हीडी-०११९/प्र.क्र.२६/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४ फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३.०६.२०१५.
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४१/भाग-१/अ-४, दि.३०.११.२०१६ व समक्रमांकाचे शासन शुद्धीपत्रक दि.२३.०२.२०१७.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
४) मा. सह दिवाणी न्यायालय (व.स्त.), अमरावती यांचेकडील भुसंदर्भ क्र.१०१/२०११, दि.०६.०४.२०१७, चे न्यायालयीन आदेश.
५) उपजिल्हाधिकारी (भुसंपादन) अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २ अमरावती यांचे पत्र क्र.अका/विभूसं/कावि-२८४ व २८३/ २०२१, दिनांक १९.०४.२०२१.
६) परिवहन आयुक्त, मुंबई यांचे पत्र क्र. प.आ/का-२ अ/सीतना-आधु/प्र.क्र.४५ -१०१७ /२०१७/ जा.क्र.१६७६, दिनांक १३.१२.२०१७ व जा.क्र. ४२२१, दिनांक ०८.०४.२०२२.

**प्रस्तावना :-**

सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरण अंतर्गत सीमा तपासणी नाका, रवाळा, ता.वरुड, जि. अमरावती या सार्वजनिक प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या संबंधात उपर्निर्दिष्ट क्र.४ येथील न्याय निवाड्यानुसार भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम २८-अ अंतर्गत अंतिम निवाड्यानुसार वाढीव मोबदल्याची रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपर्निर्दिष्ट क्र. ६ येथील पत्रान्वये कळविल्यानुसार परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या संपादक संस्थेच्या सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरण अंतर्गत सीमा तपासणी नाका रवाळा, ता. वरुड, जि. अमरावती या सार्वजनिक प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या संबंधात उपर्निर्दिष्ट क्र. ४ अन्वये भूसंदर्भ क्र.१०१/२०११ संदर्भात मा.सह दिवाणी न्यायालय (वरिष्ठस्तर), अमरावती यांनी दिलेल्या न्यायनिवाड्यानुसार वाढीव मोबदल्याची उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (अ.व प्र.) जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती यांनी परिगणित केलेली देय रक्कम एकूण रु. २,७६,४१६/- (अक्षरी रु. दोन लाख श्याहत्तर हजार चारशे सोळा फक्त) इतकी रक्कम सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** मधील नमूद भूधारकांना अदा करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची रक्कम पुढील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

अ) सदर प्रकरणात दाखल एलएसी क्र. १०१/२०११ मधील भूधारक श्री. सुधीर गजानन लेकुरवाळे यांना मा. सह दिवाणी न्यायाधिश (व.स्तर), अमरावती यांनी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने कलम २८-अ अंतर्गत अर्ज दाखल करणारे भूधारकांना मूळ निवाड्याप्रमाणे देण्यात आलेली रक्कम वजा करुन वाढीव मोबदला रक्कम देण्यात येत आहे.

ब) सदर प्रकरणातील भूधारकाने कलम १८ अंतर्गत याच सर्व्हे नंबरसाठी दिवाणी न्यायालयात संदर्भ दाखल केला नाही. कलम २८-अ अंतर्गत प्रकरण दाखल केलेल्या भूधारकांना वाढीव मोबदला कलम १८ अंतर्गत मिळाल्याने निदर्शनास आल्यास शासनाची रक्कम नियमानुसार त्यांचे स्थावर व जंगम मालमत्तेची विल्हेवाट लावून वसूल करण्याचा अधिकार शासनास राहील असे प्रतिज्ञापत्र मोबदला अदा करतेवेळी भूधारकांकडून घेण्यात येईल.

क) उप सचिव, महसूल व वन विभाग यांचे पत्र क्र. ०६/२०१५/ प्र.क्र. ८२/अ-२, दिनांक २९.०८.२०१५ च्या अनुषंगाने संबंधित भूधारकांना मोबदला अदा करण्यापूर्वी देय रक्कमेएवढ्या रकमेची बँक गॅरेंटी संबंधित जमिन मालकाकडून घेण्यात येईल. तसेच, पैसे परत करण्याचे प्रतिज्ञापत्र संबंधित भूधारकाकडून घेण्यात येईल.

ड) सदर निधी अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर खर्च होणार नाही तसेच, वाढीव मोबदला फरकाची रक्कम अदा करण्यास विलंब होणार नाही याबाबतची दक्षता उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व प्र. लाभक्षेत्र क्र.२, अमरावती तसेच प्रादेशिक परिवहन अधिकारी, अमरावती यांची राहील.

३. याकरीता उपजिल्हाधिकारी, (भुसंपादन) लाभक्षेत्र क्र.२ (अवप्र), अमरावती यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तर जिल्हाधिकारी, अमरावती यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या बाबीसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र. मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर, (०१)(०५) सीमा तपासणी नाक्यांचे आधुनिकीकरण व संगणकीकरण (२०४१ ०३१२) १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. परिवहन आयुक्त, मुंबई यांनी वरील लेखाशिर्षांतर्गत त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीपैकी परिशिष्ट-अ मधील नमूद रक्कम उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २ अमरावती यांना बीडीएस प्रणालीवर तात्काळ वर्ग करावी.

६. उपजिल्हाधिकारी, (भुसंपादन) लाभक्षेत्र क्र.२ (अवप्र), अमरावती यांनी या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी. कोणत्याही वादी/ खातेदारास उपजिल्हाधिकारी, (भुसंपादन) लाभक्षेत्र क्र.२ (अवप्र), अमरावती व न्यायालयामार्फत कोणत्याही बाबतीत दुहेरी फायदा मिळणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यानी घ्यावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३.०६.२०१५ अन्वये तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२४१२०८४३९१२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.02.24 12:12:21 +05'30'

**(भरत रा. लांघी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री (परिवहन) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, अमरावती.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, अमरावती.
६) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
७) सह सचिव,(भूसंपादन) महसूल व वने विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २ अमरावती.
९) प्रादेशिक परिवहन अधिकारी , अमरावती.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
११) जिल्हा सरकारी वकील, अमरावती.
१२) महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१३) महालेखापाल-१/२ ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१४) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) वित्त विभाग (अर्थसंकल्प शाखा-१२/व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती (परिवहन-४).

| परिशिष्ट-अ | | |
|---|---|---|
| न्यायालयीन प्रकरण क्र. १०१/२०११ | | |
| शेतकऱ्याचे नाव : श्री. सुधीर गजानन लेकुरवाळे | | |
| घर न./शेत सर्व्हे क्र.६३/१ संपादीत क्षेत्र ०.६१ हे.आर. | | |
| भूसंपादन प्रकरण क्र.१३/४७/२००७-०८ मौजा रवाळा, ता. वरुड, जि. अमरावती | | |
| **अ. क्र.** | **तपशिल** | **रक्कम** |
| १. | मा.न्यायालयाचे दिनांक ०६.४.२०१७ आदेशानुसार वाढीव मोबदला दर- ३,२०,०००/-प्र.हे. संपदान क्षेत्र ०.६१ हे.आर.-८८४५० विभूसंअ यांनी दिलेली रक्कम. (३२०००० X ०.६१ =१९५२००- ८८४५० =१०६७५०) | रु.१,०६,७५०/- |
| २. | **एकूण** | **रु.१,०६,७५०/-** |
| ३. | न्यायालयाच्या दिनांक ०६.०४.२०१७ च्या आदेशानुसार ३०% दिलासा रक्कम- | रु.३२,०२५/- |
| ४. | न्यायालयाच्या दिनांक ०६.०४.२०१७ च्या आदेशानुसार १२% प्रमाणे प्रति वर्ष विशेष घटक अंतर्गत रक्कम- (दि.०५.०६.०८ ते दि.०६.०१.१० कालावधी १९ महिने) (१०६७५० X १२% /१२ X१९ =२०२८३/-) | रु.२०,२८३/- |
| **५.** | **एकूण स्तंभ २ ते ४ ची बेरीज** | **रु.१,५९,०५८/-** |
| ६. | न्यायालयाच्या दि. ०६.०४.२०१७ च्या आदेशानुसार ९% दराने व्याज (दि. ०७.०१.२०१० ते दि. ०६.०१.२०११) | रु.१४,३१५/- |
| ७. | न्यायालयाच्या दि. ०६.०४.२०१७ च्या आदेशानुसार १५% दराने व्याज (दि. ०७.०१.२०११ ते दि. ३१.०३.२०२२ (१३४ महिने २४ दिवस) (४१०१ दिवस) (१५९०५८ X १५% /३६५ X४१०१ =२६८०६६/-) | रु.२,६८,०६६/- |
| ८. | **एकूण स्तंभ ५ ते ७ ची बेरीज** | **रु.४,४१,४३९/-** |
| ९. | प्रोसेस व्यय | ० |
| १०. | देय रक्कम | रु.४,४१,४३९/- |
| ११. | दि. १०.०४.२०१८ रोजी प्रादेशिक परिवहन विभागाने न्यायालयाच्या आदेशानुसार भरणा करण्यात आलेली रक्कम | रु.१,६५,०२३/- |
| **१२.** | **एकूण देय रक्कम** | **रु.२,७६,४१६/-** |